सन २०१९-२०२० मधील निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकःअनुवि ४९१९/प्र.क्र.३२/अर्थसंकल्प**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०४ मार्च, २०२०

**संदर्भ:-१. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०२०**
**२. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०९ जुलै, २०२०**
**३. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी, २०२०**
**४. शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.०४/२०/कोषा.प्रशा.५, दिनांक ३० जानेवारी, २०२०**

## परिपत्रक

शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि.०८ जुलै, २०१९ नुसार सन २०१९-२०२० मधील निधी वितरणाबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरिता अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदींच्या ६० % च्या मर्यादेत तसेच आमदार स्थानिक विकास कार्यक्रमासाठी १०० % च्या मर्यादेत अर्थसंकल्पिय अंदाज वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरित करण्यास सहमती देण्यात आली आहे.

संदर्भाधीन क्र.३येथील, दि.२२ जानेवारी, २०२० च्या परिपत्रकानुसार, सन २०१९-२० चे सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंत, सन २०१९-२० करिता निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात येत असून त्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पिय अंदाज वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरित करण्यास सहमती देण्यात आली आहे. सदर परिपत्रकातील तरतुदीं खालीलप्रमाणे

१. अर्थसंकल्पित निधीच्या महसूली व भांडवली लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबींची निधी वितरणाची मर्यादा ८० टक्के इतकी विहित करण्यात येत आहे. मात्र ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखालील निधीच्या वितरण व खर्चाची वित्त विभागाची पूर्वमान्यता घेणे आवश्यक राहील. सदर प्रकरणांचे प्रस्ताव विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमार्फत सादर होतील याची कृपया दक्षता घ्यावी.

२. कार्यक्रम खर्चाच्या निधी वितरणाची मर्यादा सुधारित अंदाज निश्चित होईपर्यंत दि.०८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकानुसार राहील. मात्र ज्या कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या बाबींसाठी विभागाचे प्राथम्य व झालेला खर्च लक्षात घेऊन अधिकच्या निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनाथसह व उपलब्ध निधी खर्च झाल्याची खात्री करून असे प्रस्ताव नियोजन विभाग/सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागाकडे सादर करण्यात यावेत. सदर प्रकरणांचे प्रस्ताव विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमार्फत सादर होतील याची कृपया दक्षता घ्यावी.

३. पूरवण्या मागण्यांचा निधी वितरित करण्यापूर्वी त्यास आवश्यकतेनुसार नियोजन विभाग/सामाजिक न्याय विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता घ्यावी. सदर प्रकरणांचे विहित नमुन्यात तसेच परिपूर्ण प्रस्ताव विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमार्फत सादर होतील याची कृपया दक्षता घ्यावी.

४. अर्थसंकल्पिय तरतुदींत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषीय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पिय व्यवस्थापन नियमांतर्गत निर्धारित केलेली वार्षिक लक्ष्ये साध्य करण्यासंदर्भात उपयुक्त ठरणार असल्याने अर्थसंकल्पिय तरतुदींचे पुनर्विनियोजन करण्याच्या प्रशासकीय विभागांच्या अधिकारांना स्थगिती देण्यात आली असून विभागांनी सदर प्रस्ताव आवश्यकतेनुसार नियोजन /सामाजिक न्याय /आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेतल्याशिवाय पुनर्विनियोजन करू नयेत. सदर प्रकरणांचे विहित नमुन्यात तसेच परिपूर्ण प्रस्ताव विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमार्फत सादर होतील याची कृपया दक्षता घ्यावी.

५. निधीचे वितरण व खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तिय अधिकारी नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने वेळोवळी दिलल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करताना आर्थिक वर्षातील यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या पहिल्या /दुसऱ्या हप्त्याचा निधी किती प्रमाणात खर्च झाला आहे हे दर्शविणारी BEAMS प्रणालीवरील प्रत नस्तीसोबत जोडण्यात यावी. यापूर्वी वितरित केलेला निधी खर्च झाला नसल्यास तो का खर्च झाला नाही याबाबतच्या ठोस कारणमिमांसेसह /निधी खर्च झाला असल्यास त्याबाबतच्या प्रमाणपत्रासह धारिका अर्थसंकल्प कार्यासनामार्फत सादर करण्यात यावी

७. संदर्भाधीन क्र.४ येथील दि.३० जानेवारी, २०२० रोजीच्या परिपत्रकातील खरेदीच्या प्रस्तावांबाबत देण्यात आलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०४१४४२२४३६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.03.04 14:48:23 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे स्वीय सहायक
२. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
३. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य
४. अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१०. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
१४. सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८. सर्व क्रीडा उपसंचालक
१९. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी
२०. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२२. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२३. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२४. वित्त विभाग (व्यय-५ / व्यय-१४ / अर्थसंकल्प - ८) मंत्रालय, मुंबई
२५. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.